**मा. मुंबई उच्च न्यायालय व त्याची नागपूर, औरंगाबाद खंडपीठे याठिकाणी ई-फायलिंग व अनुषंगिक तांत्रिक स्वरुपाची कामे करण्याकरिता ५० कर्मचाऱ्यांच्या सेवा बाहययंत्रणेव्दारे घेणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधी व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पदनि-५२२२/३९३/प्र.क्र. ८८/का.४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २० एप्रिल, २०२३.

**संदर्भ -**

१. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रोजेक्ट, अपील शाखा, मुंबई उच्च न्यायालय यांची पत्रे क्र. Spl/Comp/३८४/२०२२,दि. २३/०८/२०२२, क्र. Spl/Comp/४१/२०२२, दि. २१/०९/२०२२ व क्र. Comp/sec/५०/२०२२, दि. १/१२/२०२२.
२. उपसमितीच्या दि. १८/०१/२०२३ रोजी झालेल्या सन २०२३ च्या १ ल्या बैठकीचे इतिवृत्त, दि. १०/०२/२०२३.
३. उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. ०६/०३/२०२३ रोजी पार पडलेल्या सन २०२३ च्या १ ल्या बैठकीचे इतिवृत्त, दि. १०/०४/२०२३.
४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दि. २७/०४/२०२२

**प्रस्तावना -**

मा. मुंबई उच्च न्यायालय व त्याची नागपूर आणि औरंगाबाद खंडपीठे याठिकाणी ई-फायलिंग व अनुषंगिक तांत्रिक स्वरुपाची कुशल कामे बाहययंत्रणेव्दारे करण्याकरिता ५० कर्मचाऱ्यांच्या सेवा बाहययंत्रणेव्दारे घेण्यास तसेच त्याकरिता येणाऱ्या अंदाजित खर्चास मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव उच्च न्यायालय प्रशासनाने संदर्भाधीन पत्रांन्वये शासनास सादर केला होता. त्यानुसार सदरहू प्रस्ताव उपसमिती तसेच उच्चस्तरीय सचिव समितीच्या संदर्भाधीन बैठकीत मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर बैठकींतील निर्णयानुसार उक्त प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

मा. मुंबई उच्च न्यायालय व त्याची नागपूर आणि औरंगाबाद खंडपीठे याठिकाणी ई-फायलिंग व अनुषंगिक तांत्रिक स्वरुपाची कुशल कामे करण्याकरिता ५० कर्मचाऱ्यांच्या सेवा (मुळ शाखा -१५, अपील शाखा-१५ आणि नागपूर व औरंगाबाद खंडपीठ प्रत्येकी १० मनुष्यबळ याप्रमाणे) ११ महिन्यांच्या कालावधीकरिता बाहययंत्रणेव्दारे उपलब्ध करुन घेण्यास तसेच त्याकरिता येणाऱ्या रु. १,८६,३८,४००/- इतक्या अंदाजित खर्चास याअन्वये शासन मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

२. याअनुषंगाने कर्मचाऱ्यांच्या सेवा बाहययंत्रणेव्दारे घेताना संदर्भाधीन शासन निर्णय, वित्त विभाग, दि. २७/०४/२०२२ अन्वये विहित कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा. त्याअन्वये शासन खर्चात २० ते ३० टक्के इतकी बचत होईल याची दक्षता घेण्यात यावी.

३. तसेच सदरहू ५० कर्मचाऱ्यांच्या सेवांची मुदत ही प्रत्यक्ष सेवाकरार करण्यात आल्याच्या दिनांकापासुन केवळ ११ महिन्यांच्या कालावधीकरिता असेल, तद्नंतर ही मुदत आपोआप संपुष्टात येईल. तसेच संबंधित कर्मचाऱ्यांचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर राहणार नाही.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च मुळ शाखेकरिता “मागणी क्र. जे -१, २०१४ - न्यायदान, (भारित) १०२- उच्च न्यायालये, (०२) (०१) प्रबंधक, मूळ शाखा, (२०१४ ००७४) (अनिवार्य) १० कंत्राटी सेवा” व अपील शाखा, खंडपीठ नागपूर व औरंगाबाद करिता “मागणी क्र. जे -१, २०१४ - न्यायदान, (भारित) १०२- उच्च न्यायालये, (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा, (२०१४ ००९२) (अनिवार्य) १० कंत्राटी सेवा” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २०७/आपुक, दि. १८/०४/२०२३ अन्वये तसेच उपसमिती व उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेस अनुसरुन तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२११८१६३४८६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN ARUN KUMBHOJKAR

Digitally signed by PRAVIN ARUN KUMBHOJKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=87a3595a52aa9c93dd11cf6d08eb9c32c251f94716de23ff63e49022fdaff41f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=27C674EF79FE187EBCDF4FA9C80062ECA97A210FB0D7B7554B8FA6D755925AD1, cn=PRAVIN ARUN KUMBHOJKAR
Date: 2023.04.21 18:22:13 +05'30'

**(प्रविण अ. कुंभोजकर)**

उप विधि सल्लागार-नि-उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महाप्रबंधक,उच्च न्यायालय ,मुंबई, मुंबई.
२. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई, मुंबई.
३. प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प) , अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई, मुंबई.
४. प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर, नागपूर.
५. प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद, औरंगाबाद.
६. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रोजेक्ट, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-एक,मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-दोन,नागपूर.
९. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/औरंगाबाद.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
१२. वित्त विभाग, व्यय ५/आ.पु.क. कक्ष, मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यासन अधिकारी, का.२३/२४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती.